**प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र कार्यक्रमांतर्गत विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक गुणवत्ता संवर्धनाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासननिर्णयक्रमांकः एसएसए-२०१७/प्र.क्र.१५०/एसडी-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २१ जून, २०१७

**वाचा :**

१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,शासन निर्णय क्र.संकीर्ण-२४११/(८०/११)/अर्थसंकल्प, दिनांक २३/९/२०११
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,शासन निर्णय क्र.संकीर्ण-९८१४/प्र.क्र.४४(१)/एसडी-१ दिनांक २/६/२०१४
३) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,शासन निर्णय क्र.शैगुवि-२०१५/(८०/१५)/एसडी-६, दिनांक २२/६/२०१५
४) उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.भांखसं-२०१४/प्र.क्र.८२/भाग-|||/उद्योग-४, दिनांक १/१२/२०१६
५) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३ दिनांक १८/४/२०१७
६) दिनांक २ सप्टेंबर, २०१६ रोजी झालेल्या ६२ व्या कार्यकारी समिती समितीतील मंजूर ठराव क्रमांक ८३७
७) संचालक, विद्या प्राधिकरण, पुणे यांचा अहवाल क्र.विप्रा/भाषा व गणित/२०१७/१९०५ दिनांक ३१/५/२०१७
८) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नी रोड, मुंबई यांचे पत्र क्र.मप्राशिप/सशिअ/LEP/नियोजन/२०१७-१८/११९७ दिनांक २/६/२०१७

**प्रस्तावना :**

बालकांचा मोफत आणि सक्तीचा शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ ची राज्यात एप्रिल २०१० पासून अंमलबजावणी करण्यात येत आहे. राज्यातील प्रत्येक ६ ते १४ वयोगटातील मुलांस गुणवत्तापुर्ण शिक्षण प्राप्त करण्याचा अधिकार प्राप्त झालेला आहे. विविध सर्वेक्षण अहवालात सातत्याने मुलांच्या शैक्षणिक गुणवत्तेत घसरण होत असल्याचे दिसून आले. त्याअनुषंगाने राज्यात दिनांक २२ जून, २०१५ च्या शासन निर्णयानूसार प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र कार्यक्रमाची अंमलबजावणी सुरु करण्यात आली. सदर कार्यक्रमांतर्गत मुलांची भाषा विषयातील वाचन-लेखनात आणि गणितातील मुलभूत क्रियांमध्ये होत असलेली घसरण पाहता, या विषयातील संकल्पना दृष्‍धीकरणासाठी व मुलांना त्यातून आनंद मिळण्यासाठी विद्यार्थ्यांसाठी मुबलक अध्ययन व अध्यापन शैक्षणिक साहित्य वर्गामध्ये उपलब्ध करुन देण्याचे शासनाचे विचाराधीन होते. मुलांना वाचन आल्याशिवाय लेखन जमणार नाही. वैचारिक प्रगल्भता वाढविण्यासाठी भरपूर वाचनाची गरज आहे. विविध विषयातील संकल्पना तेव्हाच दृढ होतील ज्यावेळी मुलांना चांगले वाचन जमेल. त्यासाठी बालवयातच वाचनाची सवय व आवड निर्माण होण्यासाठी त्यांना त्या प्रकारची मुबलक साहित्य त्यांच्या आवतीभवती वाचनासाठी सहजपणे उपलब्ध झाल्यास त्याचा वाचन संस्कृती वाढविण्यासाठी निश्चितच उपयोग होईल. मुल हे, निरीक्षण, वस्तुची

हाताळणी, आदान-प्रदान / देवाणघेवाण, श्रवण, अनुभव या माध्यमातून स्वत: ज्ञानाची निर्मिती करते. ज्ञानरचनाद्वारे मुले जलदगतीने शिकतात असा अनुभव आहे.

त्याअनुषंगाने भाषा व गणितातील संकल्पना व संबोध सुलभ पध्दतीने समजावून सांगण्यासाठी ज्ञानरचनावाद आधरित बहुवर्ग व बहुस्तर अध्यापनासाठी आवश्यक शैक्षणिक साहित्य उपलब्ध करुन देऊन त्याचा मुलांना भाषा व गणित विषय सुलभ व मनोरंजक पध्दतीने शिकवण्यासाठी मदत होईल. त्यासाठी ज्ञानरचनावर आधारित स्वयंअध्ययन कार्ड, चित्रमय शब्द व वाक्यपट्टया, चित्रशब्द कार्ड, तक्ते, विविध शब्दांचे संग्रह,विविध शब्द व वाक्याचे चित्रमय आकार, गणिती कोडे, संख्यावाचन चक्र इत्यादी शैक्षणिक साहित्य भाषा व गणित विषयातील संबोध व संकल्पना स्पष्टीकरण दृढीकरणासाठी शिक्षकांकडे वर्गात मुलांना वैयक्तीक किंवा गटात उपलबध करुन देण्यासाठी विद्या प्राधिकरण, पुणे यांनी विद्यार्थ्यांसाठी भाषा व गणित विषयाचे समृध्दीकरणासाठी पुरक शैक्षणिक अध्ययन साहित्याची निर्मिती केली आहे. सदर भाषा व गणित विषयाचे समृध्दीकरणासाठी पुरक शैक्षणिक अध्ययन साहित्य राज्यातील सर्व शाळांना उपलब्ध करुन देण्याची शिफारस विद्या प्राधिकरण, पुणे यांनी केली आहे. यासाठी आवश्यक आर्थिक तरतूदीचा तपशिल महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषदेने शासनास सादर केलेला आहे. यासाठी सर्व शिक्षा अभियानांतर्गत अध्ययन समृध्दी कार्यक्रमांतर्गत निधी उपलब्ध असल्याचे कळविले असून राज्यात स्थानिक स्वराज्य संस्थांच्या इयत्ता १ ली ते ५ वी च्या ६६३०३ निवडक शाळेतील विद्यार्थ्यांसाठी भाषा व गणित विषयाचे समृध्दीकरणासाठी पुरक शैक्षणिक अध्ययन साहित्य उपलब्ध करुन देण्यासाठी निधी महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषदेस उपलब्ध करुन देण्यासाठी संदर्भाधीन दिनांक २/६/२०१७ च्या पत्रान्वये राज्य प्रकल्प संचालकांनी शासनास प्रस्ताव सादर केला आहे. यानुसार स्थानिक स्वराज्य संस्थांच्या प्राथमिक शाळांना भाषा व गणित विषयाचे शैक्षणिक साहित्य उपलब्ध करुन देण्यासाठी व यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :</u>**

१. राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्थांच्या इयत्ता १ ली ते ५ वी च्या ६६३०३ शाळेतील विद्यार्थ्यांसाठी भाषा व गणित विषय समृध्दीकरणासाठी पुरक शैक्षणिक साहित्य उपलब्ध करुन देण्यासाठी शासनाची प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. विद्यार्थ्यांसाठी भाषा व गणित विषय समृध्दीकरणासाठी पुरक शैक्षणिक साहित्य उपलब्ध करुन देण्यासाठी शासनाकडून रुपये ४८.०० कोटी इतका निधी महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषदेस उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर बाबीकरीता“मागणी क्रमांक ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ८००-इतर खर्च, (०१)(१०) विद्यार्थ्यांना शैक्षणिक साहित्य पुरविणे (२२०२H६७९), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)” या लेखाशिर्षांतर्गत सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत तरतुदीमधून रु.४८.०० कोटी इतका निधी खर्च करण्यात यावा.

४. यासाठी सहसचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना “नियंत्रक अधिकारी” आणि अवर सचिव (रोख शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय मुंबई यांना “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे. नियंत्रक, आहरण व संवितरण अधिकारी यांनी राज्य

प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद मुंबई यांना विनियोगाकरीता सदरचा निधी तातडीने त्यांना उपलब्ध करुन द्यावा.

५. संचालक, विद्या प्राधिकरण, पुणे यांच्या अहवालातील शिफारशी विचारात घेऊन राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांनी त्यांच्या प्रस्तावानूसार उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या दिनांक १ डिसेंबर, २०१६ च्या शासन निर्णयातील नमूद तरतुदींचे पालन करुन ई-निविदा प्रक्रिया राबवून सदर भाषा व गणित विषय समृध्दीकरणासाठी पुरक शैक्षणिक साहित्य शाळांना उपलब्ध करुन द्यावीत.

५. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १८/४/२०१७ च्या परिपत्रकाच्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्ठातील अनु.क्र.८ मध्ये नमूद अटींची पुर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्ठातील मुद्दा क्रमांक १ ते ७ मधील बाबी या आदेशासाठी लागू नाहीत. सदरचा निधी खर्च करतांना उद्योग विभागाच्या दिनांक १/१२/२०१६ च्या शासन निर्णयाप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी व सदरचा निधी चालू आर्थिक वर्षातच पुर्णपणे खर्च होईल याची आणि चालू आर्थिक वर्षात खर्च न झाल्यास शासनास निधी परत करण्याची दक्षता राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद यांनी घ्यावी.

६. तसेच सदरचा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला १४९/प.वि. उपविभाग-३, अनुक्रमांक-४ परिच्छेद क्र. २७ (२) (ब) नुसार आणि वित्त विभागाच्या क्रमांक अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३ दिनांक १८/४/२०१७ अन्वये विभागाला प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्धकरण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६२११४५५००४७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suvarna S Kharat

Digitally signed by Suvarna S Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School And Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a98fe3e5a45c818668168cffd366aced9a44c59607f616a36d403a80e74d0df, cn=Suvarna S Kharat
Date: 2017.06.21 17:28:40 +05'30'

(डॉ. सुवर्णा खरात)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मंत्री, शालेय शिक्षण यांचे विशेष कार्य अधिकारी
२. मा.प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्विय सहाय्यक
३. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नी रोड, मुंबई
४. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
५. मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधान सभा/परिषद यांचे स्वीय सहाय्यक
६. मा.सदस्य, महाराष्ट्र विधान सभा/परिषद
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
८. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर

९. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई
१०. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
११. वरिष्ठ कोषागार अधिकारी, मुंबई
१२. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१३. संचालक, महाराष्ट्र विद्या प्राधिकरण, पुणे
१४. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१५. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१६. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
१७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद सर्व
१८. शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद सर्व
१९. गटशिक्षणाधिकारी, पंचायत समिती सर्व
२०. स्थानिक निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
२१. सहसचिव (प्रशासन), शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२. उपसचिव (एसएम/अर्थसंकल्प), शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२३. उपसचिव, वित्त / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
२४. अवर सचिव, (रोख शाखा/एसडी-१), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२५. वित्त विभाग (व्यय-५ / अर्थसंकल्प -८), मंत्रालय, मुंबई
२६. निवडनस्ती, (एसडी-१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई